एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांनी सन २००९-२०१० या वर्षात खरेदी केलेले एच. डी. पी. ई. पाईपच्या प्रलंबित देयकाच्या खर्चास मंजूरी व प्रशासकिय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक- एचडीपीई-२०११/प्र.क्र.१७/का-३
मंत्रालय, मुबंई-४०० ०३२.
दिनांक - १८ मार्च, २०११.

वाचाः- १. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, कपीव्हीसी-२००८/प्र.क्र.२६६/ का-५ मंत्रालय मुबंई-३२ दिनांक-२४ डिसेंबर,२००८.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचा प्रस्ताव क्र. पाईप-२०१०/प्र.क्र.६०/ का२(१) ७६६ दि.९ फेब्रुवारी, २०११.

**शासन निर्णयः-** एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार यांनी सन २००९-२०१० या वर्षात आदिवासी शेतक-यांना एच. डी. पी. ई. पाईप पुरवठा करणे या योजनेतंर्गत महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्या. मुबंई यांचेकडून दरकरारानूसार पाईप खरेदी केले आहेत. आदिवासी शेतक-यांना एच.डी.पी.ई.पाईप पुरवठा करणे ही योजना जिल्हास्तरीय योजना आहे. सदर योजनेतंर्गत नंदूरबार जिल्हयासाठी सन २००९-१० करीता प्राप्त तरतूदीच्या अधिन राहून एच. डी. पी. ई. पाईप खरेदी केले आहेत. मात्र सन २००९-२०१० मध्ये दि. ३१/३/२०१० अखेर पर्यंत बी.डी.एस.वर एकूण तरतूदीपैकी रू.१,८१,८१,०१०/- एवढी तरतूद प्राप्त झालेली नाही, म्हणून संबंधित पुरवठादारास सदरचा निधी अदा करता आला नाही. सदर देयकास एक वर्षापेक्षा जास्त कालावधी झाला आहे. तसेच सदर सन २००९-२०१० मध्ये खरेदी केलेले एच. डी. पी. ई. पाईप संपूर्ण वाटप झाले असल्याचे एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प नंदूरबार यांनी कळविले आहे.

२. एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदुरबार यांनी सादर केलेल्या प्रस्तावानूसार सन २००९-२०१० मध्ये खरेदी केलेले एच. डी. पी. ई. पाईप चे देयक अदा करण्यासाठी एक वर्षापेक्षा जास्त कालावधी झाला असल्याने सदर वर्षात खरेदी केलेले एच. डी. पी. ई. पाईपच्या खर्चाचे प्रलंबित देयक रू १,८१,८१,०१०/- च्या खर्चास सन २०१०-२०११ मध्ये या योजनेतंर्गत उपलब्ध होणा-या निधीतून अदा करण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयक अदा करण्यापूर्वी सदर प्रकरणाची

नियमानुसार संपूर्ण तपासणी करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार यांची राहील.

३. सदर प्रशासकीय मंजूरी वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१०.०८/ प्र. क्र. ७०/२००८/ विनियम दि. १५ मे, २००९ मधील अ. क्र.६ नियम क्र. ४० अनूसार प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३१८१४४०२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

(कै. द. भंडलकर)
उप सचिव महाराष्ट्र शासन

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
जिल्हाधिकारी, नंदूरबार.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नंदूरबार.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
क.अ. (का- ६), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का-३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.